चमसनारायणाने रेवणच्या अवतारात भूलोकी स्थलांतर केले. सहनसारूक नावाच्या शेतकऱ्याला तो शेताच्या काळया रेतीत सापडला त्याने त्याला आपल्या पत्नीच्या; उत्तमाचा स्वाधीन केले उभयतांनी त्याची स्वतःच्या पुत्रासमवेत स्वपुत्र म्हणूनच निगा राखली. वयाच्या सोळाव्या वर्षी शेतात जातांना त्याला श्रीदत्तगुरूंचा परीसस्पर्श झाला आणि त्याचे सुवर्णात रुपांतर झाले. मात्र अपरिपक्वतेमुळे एका सिद्धीवरच त्याने संतुष्ट होऊन गाफीलपणे जशी जमेल तशी सिद्धी वापरली मात्र त्याने परोपकारी कामासाठीच त्याची कार्यप्रणाली राबविली. योगायोगाने त्याच बुंधल गावात गुरु मच्छिंद्रनाथ आले आणि त्यांनी रेवणला श्रीदत्तगुरूकरवी साक्षात्कारी ब्रम्हचैतन्य बनविले. रेवणचा गावकऱ्यांनी रेवणसिद्ध असा नामोल्लेख केला होता पण मच्छिंद्रनाथांनी तर रेवणसिद्धाचा कायापालट करून साक्षात रेवणनाथ ही उपाधी देऊन त्यास स्वतःसारखे तेजस्वी आणि सामर्थ्यशाली बनविले. गत अध्यायात एका ब्राम्हणाच्या घरी अतिथी म्हणून मुक्कामास राहिलेले रेवणनाथ त्या ब्राम्हणावरील शापाचे निवारण कसे करतात याचे रसाळ कथानक...

यमराजाचा सल्ला शिरोधार्य मानून रेवणनाथ कैलासावर श्रीशिवाच्या भेटीसाठी गेले. सूर्यनारायणासारखे प्रखर तेजःपुंज वाटणारे रेवणनाथ कैलासाच्या महाद्वारावर येऊन पोहोचले. द्वाररक्षक शिवगणांनी त्यांना हटकले; “कोण आपण? कुठे निघालात? येथे नवखे वाटता आहात!” अशा निरर्थक प्रश्नांनी त्यांना डिवचले. तरीही संयम राखत ते म्हणाले, “ह्या देहाला रेवणनाथ म्हणतात, श्रीशिवला भेटण्यासाठी जात आहे.” त्यावर शिवगणांनी विचारले, “काय काम आहे ते बोला! लवकर बोला! रेवणनाथ म्हणाले, “एका ब्राह्मणाच्या बाळाचे प्राण शिवाने हरण करून आणले आहेत. त्याबद्दल शिवला शिक्षा करून, त्या बालकाचे प्राण परत नेण्यासाठी आलो आहे.” हे ऐकून शिवगण संतापले, “अरे जोगी! तू शिवला शिक्षा करणार? तुझ्या या अडाणी बोलण्यावरून तुझी बुद्धिमत्ता समजली. असे शिक्षण देणारा तुझा गुरु कोणीतरी गंधर्व असावा. तुझे वर्तन लक्षण तसेच दिसत आहे. चल फिर माघारी आणि चालता हो येथून! शिवाला शिक्षा करीन म्हणे!!” रेवणनाथांच्या क्रोधाग्नीवर शिवगणांच्या या कुत्सीत बोलण्याने ज्वालाग्रही इंधनाची भर पडली. “माझ्या गुरूंची तुलना गंधर्वांशी करून त्यांचा अपमान करता काय? तुम्हाला गुरुविद्येचा हिसका दाखवतोच आता.” असे म्हणून नाथांनी स्पर्शास्त्र प्रयोगाने भस्म भारून उडवताच तेराशे शिवगण भूमीला चिकटले. पाऊल पुढे टाकण्याचा प्रयत्न करून ही पाय उचलले जात नव्हते. हात लावून जमिनीवर चिकटलेले पाऊल जोराने ओढण्याचे प्रयत्न केले असतां त्यांचे हातही चिकटले गेले आणि उभे होते ते ओणवे झाले आणि त्यांची अवघड स्थिती झाली. नाथांनी विचारले, “आता कुणाचा गुरु गंधर्व आहे? सांगा बरे पुन्हा!” जे शिवगण दूर अंतरावर स्पर्शास्त्रांच्या प्रभावा बाहेर उभे होते, ते ही विपरीत घटना पाहून थरारले. त्यांनी तातडीने हे वृत्त सांगण्यासाठी श्रीशिवाकडे धाव घेतली. “महाराजा निळकंठा, एक युद्धनिपुण मानव महाद्वारावर आला असून त्याने शिवगणांना भूमीला हात पाय जमिनीला चिकटलेल्या अवस्थेत ओणवे करून ठेवले आहे. सर्वजण हताश होऊन रडत, ओरडत आपला धावा करीत आहेत.” असे सांगताच श्रीशिवाने कल्पांत भैरवांना आज्ञा केली, “पहा रे कुणीतरी उद्धट आला आहे,! निघा आणि त्याला दंड करा.”

हा आदेश ऐकताच शतकोटी गणसेना घेऊन अष्टभैरव चाल करून गेले. महाद्वारावर तेराशे शिवगण ओणवे, अवघड अवस्थेत पाहून अत्यंत संतप्त झाले. त्यांनी त्रिशूल बाणांनी नाथांवर हल्ला चाडविला पण नाथांनी अस्त्रप्रतापांनी ते वरच्यावर भेदून बाणांना निष्प्रभ केले. अष्टभैरवांना हा अपमान सहन झाला नाही, त्यांनी धनुष्यांचा प्रलयंकारी

टणत्कार करून बाण चढविले. बाणांच्या अग्रांवर वातास्त्र, नागास्त्र, धूम्रास्त्र, वासवास्त्र, ब्रम्हास्त्र, वज्रास्त्र, विभक्तास्त्र अशी भयंकर अस्त्रे विरजमान करून बाण सोडले. आकाशमार्गे त्या अस्त्रशक्ती प्रकट होऊन नाथांवर धावून आल्या, तेव्हा नाथांनी एकाच भस्मचिमुटीवर एकत्र आठ अस्त्रे; पर्वतास्त्र, जलादास्त्र, खगेंद्रास्त्र, सुर्यास्त्र, कालिकास्त्र, स्तवनास्त्र, इंद्रास्त्र, मोहनास्त्र निर्माण करून त्यांच्या अस्त्रांचे निवारण केले. आकाशातच निष्प्रभ झालेली ती अस्त्रे उलटून भैरावांवरच पडली. त्यामुळे भैरव जर्जर झाले. शक्तिपात झाल्याने दुर्बळ, क्षीण झाले. अष्टभैरव विफल होऊन पडल्याची बातमी गुप्तहेरांनी श्रीशिवाला कळवली. या वृत्ताने अतिशय क्रुद्ध झालेल्या श्रीशिवाने संतापाने नंदी सज्ज केला. त्रिशूल, खड्ग, चक्र, चापबाण, अंकुश, डमरू, शंख, नरकपाळ, आणि एका हाताने नंदीचा लागाम धरून दौड केली. दशकर दौडत आलेला पाहून नाथांनी विचार केला, “जास्त हाणामारी कशासाठी करावयाची?” म्हणून त्यांनी वाताकर्षण मंत्राने भस्म भारून श्रीशिवांवर सोडताच त्यांचा श्वासोश्वास कोंडून धावत्या नंदीसह उलथून पडले. गात्रे विफल झाली. हातातील शास्त्रे गळून पडली. तोंडातून रक्तस्त्राव वाहू लागला. डोळे पांढरेफटक पडले आणि मूर्च्छितच झाले. अष्टभैरवसुद्धा बेशुद्धावस्थेत आणि तेराशे शिवगण ओणवे चिकटलेले. सर्वत्र गोंधळलेले आणि हाहाकाराचे वातावरण पसरले होते. अंतराळात लपून गुपचूपपणे हे युद्ध पाहणारे गंधर्व, श्रीशिवाची ही दयनीय अवस्था पाहून हादरलेच. त्यांनी घाईघाईत श्रीविष्णूकडे जाऊन हा वृतांत कथन केला. पाचावर धारण बसल्यामुळे श्रीविष्णू मनापेक्षाही अधिक वेगाने त्याठिकाणी उपस्थित झाले आणि रेवणनाथांना कवेत घेऊन म्हणाले, “तपःपती, एवढा कोप करण्याचे कारण तरी सांग?” “वैकुंठनाथा! सरस्वती ब्राम्हणाच्या घरी मी प्रत्यक्ष उपस्थित असतानाही शिवाने त्याच्या बालकाचे प्राण हरण केले आहेत. त्याची शिक्षा म्हणून मी शिवाचा प्राणही घेईन आणि संजीवनीमंत्र प्रयोगाने ब्राम्हणाची सर्व बालके सजीव करेन. जर शिवाचा प्राण वाचवायचा असेल तर त्वरित सातही बालकांचे प्राण परत करावेत.” रेवणनाथांनी स्वतःच्या संतापाचे मूळ कारण श्रीविष्णूंना कथन केले. त्यावर ते म्हणाले, “अरे; सातही बालकांचे आत्मे माझ्या जवळ आहेत. ते मी तुझ्याकडे सोपवितो पण त्या आत्म्यांसाठी देह तुम्ही निर्माण करावेत. पण सर्वप्रथम सदाशिवाला सावध कर.” “ठीक आहे जशी आपली आज्ञा!” असे म्हणून नाथांनी वातप्रेरक अस्त्राने श्रीशिवांना सावध केले. विभक्तास्त्राने शिवगणांची सुटका केली, सुखवास मंत्राने अष्टभैरवांना विभूती लावून त्यांचीही पीडेतून मुक्तता केली. सर्वांनी नाथांना वंदन करून त्यांचे आभार व्यक्त केले. नाथांनीही श्रीशिवांना वंदन केले. विष्णूंकडून सातही बालकांचे आत्मे घेऊन रेवणनाथ भूमीवर उतरले.

सरस्वती ब्राम्हणांस सांगितले, “मृत बालकाचा देह उखळात कुटून मेणासारखा मऊ, एकजीव करून माझ्याकडे आणा.” सरस्वती ने निष्ठुर मनाने बाळाचा देह उखळात कुटला. मेणासारखा गोळा करून नाथांच्या स्वाधीन केला. त्यांनी त्याचे सात पुतळे तयार केले. संजीवनी मंत्र प्रयोगाने सात बालदेह निर्माण केले. त्यांमध्ये आत्म्याचा प्रवेश होताच एकदम सात बालके जिवंत होऊन त्यांच्या टँहां टँहां रडण्याचा एकच कालवा झाला. नाथांनी सरस्वती आणि त्याची पत्नी जान्हवीच्या ओटीत सात बालके घालून त्यांचा सांभाळ करावयास सांगितले. एवढी वर्षे जान्हवीच्या कुशीत एकही बाळ वाचत नव्हते आणि आता एकदम सात बाळांनी कूस भरून गेली. कोणत्याही अन्य मातेला अशी एकदम सात बाळे होण्याचे भाग्य लाभले नसावे. बाराव्या दिवशी बाळांचे बारसे झाले. त्यांची नावे; सारंगीनाथ, जोगीबानाथ, निजानंद, नयननाथ, यदुनाथ, निरंजननाथ, गहिनीनाथ अशी ठेवली. पुढे बारा वर्षांनी रेवणनाथांनी त्यांना अनुग्रह देऊन

विद्यापारंगत केले. सिद्धपुरुष म्हणून जगाद्विख्यात केले. त्यांची चौऱ्याऐंशी सिद्धांत गणना झाली. लोकांच्या आग्रहास्तव आणि रेवणनाथांचेही मन त्या विटे गावात रमल्याने, अद्यापपर्यंत त्यांचे वास्तव्य तिथे आहे.

ज्यांच्या हातून बालहत्येचे पाप घडले आहे. त्यांनी हे कथानक नित्य श्रवण केल्यास, त्या पापातून त्यांची मुक्तता होईल. तसेच ज्या स्त्रीची अपत्त्ये वाचत नसतील, तिने सुस्नात होऊन या कथेचे श्रवण पठाण केल्यास, तिची अपत्त्ये जगून दीर्घायु होतील, असे स्पष्ट अभिवचन या ग्रंथाचे मूळ ग्रंथकर्ते गुरु गोरक्षनाथ यांनी दिलेले आहे.

आता वटसिद्धनाथांचे कथानक पाहू. पूर्वी सरस्वतीच्या सौंदर्याने मोहित होऊन ब्रम्हदेवाचा वीर्यपात झाला असतां, त्यातील काही भाग 'पद्मिनी' नामक सर्पिणीच्या मस्तकावर पडला. तिने तो भक्षण केला होता पण तिच्या उदरांत तो विर्याचा अंश तसाच सुरक्षित होता. पुढे त्यांत अविर्होत्र नारायणाने प्रवेश करताच गर्भधारणा झाली. नवनाथातील वटसिद्ध नागनाथ त्या गर्भातून अवतारणार असल्याची बाब आस्तिक ऋषींनी अंतर्ज्ञानाने जाणले होते. त्यामुळे त्यांनी सर्पिणीला बोलावून सांगितले, "माई! तुझी कूस फार भाग्याची आहे. तुझ्या उदरात 'अविर्होत्र नारायण' वाढत आहे. त्यासाठी तू स्वतःची काळजी घे. हे सांगावयाचे कारण म्हणजे, पुढे एक दुर्घट विघ्न चालून येणार आहे. हस्तिनापुर नरेश जनमेजय सर्पयज्ञ करणार आहे. सर्व ऋषींना यज्ञाला बसवून त्यांच्या करवी मंत्रोच्चाराने यज्ञकुंडात सर्पसमिधां अर्पण करील. किती फण्यांची आहुती पडेल ते काही सांगता येणार नाही. म्हणून मी तुला सावधान करण्यासाठी खास बोलाविले आहे. तु कुठेतरी सुरक्षित ठिकाणी दडून राहिले पाहिजे." हे ऐकून भयभीत पद्मिनी सर्पिण म्हणाली, "मुनिवर, मी कुठे लपून बसू? संभाव्य महासंकाटापासून कसा बचाव शक्य आहे!" आस्तिक ऋषींनी सुरक्षित ठिकाणासाठी स्वतःची शोधक नजर चौफेर फिरवली असतां त्यांना एक जुनाट वाटवृक्ष दिसले. वृक्ष, अनेक ठिकाणी पोखरलं गेल्यामुळे त्यांत अनेक ढोली तयार झाल्या होत्या. त्याकडे पाहत ऋषी म्हणाले, "दैवी माते! त्या महावृक्षाच्या ढोलीत लपून बस!" ती गर्भवती पद्मिनी नागीण सळसळ करीत एका ढोलीत जाऊन लपून बसली. त्यानंतर आस्तिक ऋषींनी त्या ढोलीभोवती सुरक्षा कवच निर्माण केले आणि ते हस्तीनापुराकडे निघून गेले.

कुरुवंशीय जनमेजय राजाच्या हस्तिनापुर नगरीत सर्पयज्ञाची तयारी झाली होती. आस्तिक ऋषी यज्ञमंडपात गेले. सर्व ऋषीवृंदांना गुप्तपणे विश्वासांत घेऊन पद्मिनी सर्पिणीचा वृतांत सांगितला आणि विनंती केली की, "तिच्या उदरात ब्रम्ह वीर्यापासून अविर्होत्र नारायण वाढत असून तो नवनाथांपैकी एक अवतारी वटसिद्धनाथ आहे. त्यामुळे आपण त्या गर्भार सर्पिणीची आहुती मागू नये." ते ऐकून सर्व ऋषींनी दिव्यचक्षुंनी या कथनाची सत्यता पहिली आणि संमती दिली. नंतर मंत्रप्रयोगातून पद्मिनी सर्पिणीचे नाव रद्दबातल केले. याचाच अर्थ तिला अभयाचे वरदान लाभले. कालपरत्वे वटवृक्षाच्या ढोलीत लपून बसलेल्या पद्मिनीचा गर्भकाळ पूर्ण होत आला आणि तिथे हस्तिनापुर मधला सर्पयज्ञसुद्धा समाप्त झाला होता. दिवस भरल्यानंतर तिने एका तेजस्वी अंडे घातले. त्या अंड्यात अविहोत्र नारायण वाढत होता. यथावकाश कलेकलेने गर्भवाढ होऊन अंड्यात मावेनासा झाल्यामुळे कवच भंगले. वटवृक्ष खोडाच्या ढोलीत बालकाचा जन्म होऊन ते बाळ मधुर रडू लागले. पाण्यामधली मासोळी अचानक सुरकांडी मारून पाण्याबाहेरील भूमीवर पडल्यावर जशी तळमळते, तसे त्या तान्हुल्याचे तळमळणे होते. कांही वेळाने कोशधर्म नावाचा एक षटशास्त्र, चातुर्वेदपारंगत, विद्वान परंतु गरिबीने गांजलेला दरिद्री ब्राम्हण पत्रावळीसाठी पाने तोडावयास त्या झाडाजवळ आला. कुठून तरी बाळाचे रडणे त्याच्या कानावर पडत होते परंतु दिसत नसल्याने, तो कावरा बावरा होऊन इकडे तिकडे पाहत होता. त्याचा

भांबावलेपणा आणि भ्रम दूर होण्यासाठी आकाशवाणी झाली. "कोशधर्मा, निट ऐक, या वडाच्या ढोलीत एक बालक आहे, त्याला घरी नेऊन त्याचे संगोपन कर. त्याच्या रूपाने तुला दौलतच सापडली आहे असे समज. तुझे दारिद्र्य नष्ट होऊन भाग्य बदलेल परीसस्पर्शाने लोखंडाचे शुद्ध सोन्यांत रुपांतर व्हावे, तसे या बालकाचा सांभाळ केल्यास, तुझे दुःख, दारिद्र्य, चिंता, व्यथा नाश पावून सुखाचा सूर्योदय होईल. हे तेजस्वी बालक म्हणजे अविर्होत्र नारायण आहे." असे बोलून देवतांनी बाणाने वृक्ष खंडन करून पाडले असतां ढोलीमधले बाळ दिसू लागले. चंद्र सूर्यासारखा तेजस्वी, देखण्या बाळावर आकाशातून पुष्पवृष्टी झाली. काही क्षणानंतर पुन्हा आकाशवाणी झाली. "कोशधर्मा, हा बालक पद्मिनी नागिणीच्या पोटी, वडाच्या ढोलीत जन्मल्याने याचे नाव वटसिद्ध नागनाथ असे ठेव. याच नावाने तो नाथपंथात नामवंत होईल." ह्या आकस्मिक घडलेल्या प्रसंगाने गांगरलेला कोशधर्मा आकाशवाणीतल्या स्पष्ट आदेशाने सावरला. पत्रावळीसाठी पाने खुडण्याचे विसरला आणि आनंदित होऊन बाळाला घेऊन घरी गेला. त्याची पत्नी सुरादेवी ही सुशील, सात्विक, उदार, दयाळू, प्रेमळ अशी सर्वगुण संपन्न उत्तम स्त्री होती. तिने या बाळाला पाहताच पतीच्या हातातून अधिरतेने जवळ जवळ ओढूनच घेतले. त्याचे अतुलनीय देखणेपण पाहून ती हरखूनच गेली. तिने विचारले, "एवढा सुंदर हा सानुला कोणाचा आहे? अहो! हा चिमुकला सूर्यच दिसतोय. याच्या गोजीऱ्या, गोमट्या स्वरुपापुढे चंद्रसुद्धा गौण वाटेल. हा बालमूर्ती ईश्वर तुमच्याकडे कसा? नभांगणात नक्षत्रांची दाटी झाल्याने ईश्वराने त्या सर्वांचे एकरूप करून तुमच्या हाती सोपविले की काय? किती छान आहे हा!" मग कोशधर्माने तिला इत्यंभूत सर्व घडामोडी सांगितल्या. तिने बाळाला हृदयाशी धरल्याबरोबर तिच्या स्तनांमध्ये पान्हा भरून आला. स्तनाग्र बाळाच्या मुखात घालताच बाळाने दुध पिण्यास सुरवात केली. देहाचा कणन्कण पुलकित होऊन सुरादेवीने डोळे मिटले. पोटभर दुध प्यायल्यानंतर बाळ शांत झोपी गेला. नंतर त्याचे टाळू भरून त्याला अंघोळ घातली आणि पाळण्यात घालून मंजुळ आवाजात अंगाई गीतांच्या ओव्या गात बाळाला झोपवले. वटसिद्ध दिसामासांनी वाढत होता. सुरादेवीला तर रात्रंदिवस त्याच्या शिवाय चैनच पडत नसे. त्याच्यावरून पंचप्राण ओवाळून टाकत होती. प्रेमळ मातेच्या माया छत्राखाली वाढता वाढता बाळ सात वर्षांचा झाला. त्यांचे मौजीबंधन केले. पवित्र काशीक्षेत्र नगरीत बाळ वाढू लागला.

एकेदिवशी नागनाथ समवयस्क बाल सवंगड्यांसह खेळत भागीरथीच्या तीरावर गेला होता. दुपारचे दोन प्रहरी काशी विश्वेश्वराच्या देवालया समोर तो खेळत आहे. सर्व मुलात तो उठून दिसतोय. तेवढ्यात श्रीदत्तगुरु तेथून जात होते. त्यांची दृष्टी वटसिद्धावर पडली. सर्व मुलांची जेवणाची पंगत बसवून नागनाथ खोटे खोटे अन्नपदार्थ वाढतोय. मुलेही पोटावरून हात फिरवीत खोटे खोटे ढेकर देत आहेत. "आता आणखी वाढू नकोस गड्या! पोट भरलंय." असे म्हणत आहेत. "अरे घे रे! थोडेसे घे. हा लाडू नाही तर हे श्रीखंड घे." असा आग्रह वाढणारा करीत आहे. निरागस मुलांचा हा खेळ कौतुकाने पाहत श्रीदत्त उभे आहेत. ते मनाशी म्हणाले, "लटक्या अन्नाने पोट भरल्याचे मुले नाटक करीत आहेत. चला! त्यांना खरेखुरे अन्न खाऊ घालून संतुष्ट करू या." मग ते बाळरूप धारण करून मुलांच्या जवळ जाऊन म्हणाले, "मी तुमच्याकडे अतिथी म्हणून आलो आहे. भूक लागली आहे, मलाही तुमच्या पंक्तीला जेवायला घालावे." बाळरूपातील दत्तांची जवळीक मात्र त्या मुलांना मान्य झाली नाही. इतर मुले त्यांच्यावर खेकसली, "अरे, तू रे कोण आमच्यात खेळावयास आलास? असे म्हणत एक दोघे बाह्या सावरीत, कोणी शेला उगारीत, कोणी दगड घेऊन धावून आली आणि दरडावू लागले, "जातोस का हाणू तुला?" खेळात बिघाड होऊ नये म्हणून वटसिद्धाने त्या आक्रमक मुलांना आवरले. त्यांना आडवत तो म्हणाला, "गड्यांनो माझे ऐका! आपण ताटावर बसल्यावर जर कोणी अतिथी आला तर

त्याला भोजन घातल्याशिवाय विन्मुख पाठवायचे नसते असे आपले मातापिता आपल्याला शिकवतात हे खरे आहे ना? तसा हा आपला अतिथी आहे. अतिथी देवो भवः” असे म्हणून त्याने अतिथींना लटक्या आसनावर बसविले. काल्पनिक स्नान घातले, अंग पुसले, खोटी खोटी फुलांची माळ त्यांच्या गळयांत घातली, धूपदीपाने ओवाळले. लटकी पूजा करून मनोभावे नमस्कार केला. काल्पनिक ताट मांडले आणि लटके पदार्थ वाढावयास सुरवात झाली. वटसिद्ध हात जोडत म्हणाला, “अतिथी देवा, संकोच करू नका. पोटभर खावे.” पाहुण्यांना पुन्हा पुन्हा आग्रह करून वाढत होता. हा मौजेचा खेळ पाहून अतिथी रूपातील श्रीदत्त विचार करीत आहेत, “बालक सद्‌गुणी आणि सुसंस्कारीत आहे. उदारह्रदयी, धार्मिक अधिष्ठान, रसाळ वाणी, इतरांना न दुखावण्याची वृत्ती हे सारे गुण श्रेष्ठ योगी पुरुषांतच आढळतात, कदाचित हा पूर्वजन्मीचा योगी असावा.” त्यांनी दिव्यदृष्टीने त्याचा पुर्वजन्म जाणला असतां, तो अविहोत्र नारायण असल्याचे त्यांना दिसून आले. अतिशय आनंदीत झालेल्या श्रीदत्तांनी त्याला जवळ बोलावून त्याच्या कानात म्हणाले, “तू या काल्पनिक भोजनाऐवजी मुलांना खरोखरीचे भोजन देऊ शकशील. मी तुला एक सिद्धी देतोय. त्या योगे तू ज्या पदार्थाचे नाव घेशील, तो पदार्थ निर्माण होईल परंतु तू स्वतः मात्र ते अजिबात खायचे नाही.” असे म्हणून श्रीदत्तांनी त्याच्या कानात सिद्ध मंत्र सांगितला. त्यामुळे नाव घेईल तो पदार्थ निर्माण होऊ लागला सर्व बालचमूने पक्वन्नावर यथेच्छ ताव मारला. नागनाथाला स्वतःचे नाव सांगून श्रीदत्तात्रेय निघून गेले.

वटसिद्ध नागनाथांना सिद्धी मिळाली. त्यामुळे परिणाम असा झाला की रोज खेळून पक्वान्ने हादडायची, हा मुलांचा नित्यक्रम झाला. स्वतःच्या घरात मुलांनी जेवणे बंद केले. वटसिद्धाने दिलेले षड्रसान्न खाल्ल्यावर त्यांना घरतल्या कदान्नाची चव कशी लागेल? जे ब्रम्हरूप मिळवून तृप्त झाले, ते माया व द्‌वैत यांची खीर का म्हणून प्राशन करतील? ज्याच्याकडे सुवर्ण कोंदणात जडवलेली रत्ने आहेत तो काचेचा मणी कशाला बाळगेल? उत्कृष्ट कारागिरीने नटलेला, सुगंधी फुलांची मऊ शय्या घातलेला, घरातील मंचक सोडून गल्ली बोळातल्या दुर्गंधीत कोण कशाला जाऊन पडेल? या न्यायाने मुलांनी घरचे अन्न तोंडाला लावायचेच सोडले. त्यांच्या आईबापांनी विचारले असता मुले म्हणाली, “तुम्ही दारिद्र्यांसारखे कांजी पाणी कदान्न खाता, आम्ही गंगा तीरावर जाऊन रोजच पंच पक्वान्ने, षड्रसान्न खातो.” मुलांच्या वक्तव्याची सत्यता पडताळून पाहण्यासाठी पालकांनी लपून छपून पहिले असतां त्यांना मुलांच्या पंगती बसवून नागनाथ वाढीत असल्याचे दृश्य दिसले. या चमत्काराची बातमी सर्वत्र वाऱ्यासारखी पसरली. कोशधर्माच्या कानावरही गोष्ट गेली, तेव्हा त्याला आकाशवाणीचे स्मरण झाले. या गोष्टीची हुरहूर लागल्यामुळे एकेदिवशी कोशधर्माने वटसिद्ध नागनाथाला कौतुकाने मांडीवर बसविले, त्याचा मुका घेऊन त्याला कुरवाळले, विश्वासांत घेऊन विचारले, “पुत्रा! मुलांना तू कसा भोजन घालतोस? त्यावर वटसिद्ध सहजपणे म्हणाला, “ताता! तुम्हालासुद्धा तसेच भोजन मी आता घालतो” असे म्हणून तो मांडीवरून उठला. हात पुढे करून पादार्थांची नावे घेताच ते ते पदार्थ निर्माण होऊ लागले, ते पाहून कोशधर्माला फार आश्चर्य वाटले, त्याने विचारले, “पुत्रा, हे कसे घडते? हे तुला कोणी शिकावले?” वटसिद्ध सांगू लागला, “ताता! एकदा आम्ही खेळत असतां एक अतिथी बालक खेळावयास आले होते. तुम्ही करता तशी मी लुटूपूटीची अतिथीसेवा केल्यामुळे ते दत्तात्रेय नावाचे बालक संतुष्ट होऊन त्याने मला हे शिकवले. त्याने माझा हात धरला. कानात फुंकले, डोक्यावर हात ठेवला आणि वाढावयास लावले.” जे काही समजायचे ते कोशधर्माला समजून चुकले. पुन्हा एकदा आकाशवाणीचे बोल त्याला आठवले.

काही दिवसात नागनाथाची किर्ती सर्वत्र पसरली. अखंडपणे अन्नछत्र झडू लागले. अगणित लोक भोजन करून तृप्त होत होते. तसेच वस्त्रे, सुवर्ण, धनसुद्धा प्राप्त करून समाधानाने परत जात. नागनाथाचा गाजावाजा चहुकडे होत होता. वयोमानानुसार परिपक्वता आल्यावर, एक दिवस नागनाथ पित्याजवळ बसून म्हणाला, "ताता! माझ्या हातून अनेकांची क्षुधा तृप्त होते. परंतु सर्व जगाची, चराचराची क्षुधा कोण तृप्त करतो? जगाचा हा कारभार कोण हाकतो? दत्तात्रेय नामक बालक मला तेव्हा भेटला होता, तो कोण महापुरुष होता, कोण जाणे!!" त्याच्या प्रश्नाला कोशधर्म उत्तरले, "पुत्रा, ब्रम्हा, विष्णू आणि महेश या तिन्ही देवांचा एक अवतार, गुरूंचा ही गुरु म्हणजे श्रीदत्तात्रेय आहेत. तुझे भाग्य थोर म्हणून त्यांची भेट झाली." वटसिद्धाने आते ते कुठे भेटतील, अशी पृच्छा केल्यावर कोशधर्मा म्हणाले, "बाळा! त्यांची भेट होणे हीच परमभाग्याची गोष्ट आहे. ते सतत तीर्थयात्रा करीत फिरत असतात; कोल्हापूर, पांचाळेश्वर, काशी, माहूर अशा अनेक ठिकाणी त्यांची भ्रमंती असते." असे बोलून ते काही कामानिमित्त निघून गेले. मनस्वी नागनाथांनी श्रीदत्तांना भेटण्याचा ठाम निश्चय केला. माहूर, पंचालेश्वर शोधून तो कोल्हापुरात आला. कुणी भेटेल त्याला श्रीदत्तात्रेय कुठे भेटतील म्हणून विचारू लागला. त्याला वेड्यात काढून लोक म्हणत, 'अरे बाबा! दत्तमहाराज काय डोक्यावर मुकुट घालून आपल्यासमोर भिक्षा मागायला येतील काय? ते प्रकट रुपात फिरत नाहीत. कोणत्या रुपात येऊन भिक्षा मागून जातात ते कुणालाही कळत नाही." वटसिद्धाची शंका म्हणजे, "ते इथेच का भिक्षा मागतात? इतर ठिकाणी सुद्धा मागत असतील." अशी शंका विचारल्यावर, कुणीतरी स्पष्टीकरण केले, "कोल्हापूराशिवाय इतरत्र कुठेही ते भिक्षा मागत नाहीत. दुसरीकडचे अन्न खात नाहीत कारण कोल्हापूर हे पुण्यपावन क्षेत्र आहे. येथे भिक्षा मिळाली नाही तर ते उपाशी राहतात परंतु दुसरीकडचे अन्न खात नाहीत. तो त्यांचा नियम आहे. या स्थानाची भाजीभाकरी त्यांना पवित्र वाटते पण अन्य ठिकाणचे पंचपक्वान्न सुद्धा त्यांना अपवित्र वाटते. जशी एकपत्नी व्रत मानणाऱ्याला पत्नी कुरूप असली तरी तो तिच्याशीच रत होईल. लावण्यलतीकासुद्धा त्याला कस्पटासमान भासते. उच्चवर्णीय ब्राम्हण भूक असहाय्य झाली तरी ब्राम्हणाच्याच हातचे कदान्न भक्षण करील पण शुद्राच्या हातचे षड्रसान्नाला स्पर्शही करणार नाही. त्याच्या मनोदेवतेला ते मान्य होणार नाही. तशीच श्रीदत्तांची ह्या स्थानाबद्दल निष्ठा आहे."

नागनाथांनी मनात एक विचार निश्चित केला. "संपूर्ण कोल्हापूराला पक्वान्नाचे जेवण देऊया. 'कुणीही चूल पेटवायची नाही.' असे घरोघरी आव्हान करावयाचे, लोकांच्या घराघरात सिद्धी अन्न पाठवून द्यावे. तसे झाले तर गुरुदत्तांना भिक्षा मिळणारच नाही कारण सिद्धी अन्नाची भिक्षा ते स्वीकारणार नाहीत. उलट त्यांनी सिद्धी मंत्र आपल्या कानात सांगितला तेव्हा, आपल्यालाही हेच सांगितले होते की लोकांना अन्न दे पण तू मात्र खाऊ नकोस, अशी सक्त सूचना केली होती. योजना पक्की झाल्यावर वटसिद्ध महालक्ष्मीच्या मंदिरात जाऊन पुजाऱ्यास भेटले. राहण्यासाठी एक ओसरी मागून घेतली. पूजाऱ्याशी संपर्क वाढवून त्यांचा विश्वास संपादन केला. मग एके दिवशी त्यांना म्हणाले, "पुजारीजी ग्रामभोजन घालण्याचा विचार माझ्या मनात आला आहे. तरी आपण आजपर्यंत सहकार्य केले तसे या ग्रामभोजनातही सहकार्य करावे अशी अपेक्षा आहे." गालातल्या गालात हसून पुजारी म्हणाला, "आम्ही सहकार्य अवश्य करू हो! परंतु ग्रामभोजन घालणार कसे? तुमच्याजवळ तर अन्नाचा कण ही नाही." त्यावर आत्मविश्वासपूर्वक नाथ म्हणाले, "पुजारीबुवा! सर्व सामुग्री तयार आहे. तुम्ही पुढच्या तयारीला सुरवात करावी. चिंता करू नये." नागनाथ तिथून निघताना पुजारी म्हणाला, "ठीक आहे. धर्मकार्याला हातभार लागून आमच्या पदरीही तेवढेच पुण्य पडेल!" नागनाथांनी

कोरड्या अन्नाचे नाव घेऊन धान्यराशी उभारल्या. तसेच सुवर्णाचे ढीग निर्माण केले. तेल, तूप इत्यादींचे हांडे भरले. सर्व सिद्धता करून पूजाऱ्याला आणून दाखवले. नेत्र विस्फारून पुजारी पाहत राहिला.

फलश्रुती: या अध्यायाच्या श्रवणाने, पठणाने सर्प, वृश्चिक दंश होणार नाही, झाला असल्यास विषबाधा होणार नाही.